स्वीयेतर सेवेतील शासकीय कर्मचाऱ्यांना देय होणाऱ्या
प्रतिनियुक्ती भत्त्यात सुधारणा.

महाराष्ट्र शासन

वित्त विभाग

शासन निर्णय, क्र. स्वीयेसे. १०८८/प्र. १०९३/सेवा-२,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२, दिनांक ८ जुलै १९९०.

## <u>शासन निर्णय</u>

महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ च्या परिशिष्ट-दोनमध्ये शासकीय कर्मचाऱ्यांची स्वीयेतर सेवेत बदली करण्यासंबंधातील प्रमाण अटी व शर्ती नमूद करण्यात आलेल्या आहेत. यामधील अट (२) अन्वये शासकीय कर्मचारी स्वीयेतर सेवेत गेला असता त्याला सर्वसाधारण नियमानुसार प्रतिनियुक्तीच्या पदाचे वेतन निश्चित करून घेणे किंवा जर त्याची स्वीयेतर सेवेत प्रतिनियुक्ती झाली नसती तर त्याच्या प्रतिनियुक्तीच्या लगतपूर्वी त्याने शासनाकडील पदावर जे वेतन घेतले असते ते वेतन अधिक त्या वेतनाच्या जास्तीत जास्त २० टक्के इतका, परंतु दरमहा रु. २५० च्या कमाल मर्यादेपर्यंत, प्रतिनियुक्ती भत्ता घेणे, यांपैकी कोणताही एक पर्याय स्वीकारता येतो. त्यानुसार प्रतिनियुक्ती भत्त्याचा पर्याय स्वीकारलेल्या स्वीयेतर सेवेतील कर्मचाऱ्यांच्या प्रतिनियुक्ती भत्त्यात केंद्र शासनाचे प्रतिनियुक्ती भत्त्यासंबंधातील आदेश व दिनांक १ जानेवारी १९८६ पासून लागू करण्यात आलेल्या सुधारित वेतनश्रेणी लक्षात घेऊन सुधारणा करण्याचा प्रश्न शासनाच्या विचाराधीन होता. याबाबत शासन असे आदेश देत आहे की, ज्या स्वीयेतर सेवेतील कर्मचाऱ्यांनी शासनाकडील वेतन व त्यावर प्रतिनियुक्ती भत्ता घेण्यासाठी विकल्प दिला असेल त्यांना यापुढे खालील-प्रमाणे प्रतिनियुक्ती भत्ता देण्यात यावा :—

(अ) जेव्हा शासकीय कर्मचाऱ्याची प्रतिनियुक्ती मूळच्याच ठिकाणी (Within the same station) असेल तेव्हा दरमहा रुपये २५० च्या कमाल मर्यादेच्या अधीनतेने, त्याच्या मूळ वेतनाच्या ५ टक्के,

(ब) इतर प्रकरणी, म्हणजेच जेव्हा शासकीय कर्मचाऱ्याची प्रतिनियुक्ती मूळच्या ठिकाणाव्यतिरिक्त इतरत्र ठिकाणी असेल तेव्हा दरमहा रु. ५०० च्या कमाल मर्यादेच्या अधीनतेने, त्याच्या मूळ वेतनाच्या १० टक्के :

मात्र त्याचे मूळ वेतन अधिक प्रतिनियुक्ती भत्ता हा कोणत्याही बाबतीत दरमहा रु. ७,३०० पेक्षा जास्त होता कामा नये.

टीप.—वरील (अ) च्या प्रयोजनासाठी "मूळच्याच ठिकाणी (Within the same station)" याचा अर्थ "प्रतिनियुक्तीवर जाण्यापूर्वीचे कर्मचाऱ्याच्या नियुक्तीचे ठिकाण (Last place of posting of the employee prior to his being sent on deputation)" असा असेल.

२. वर परिच्छेद १ प्रमाणे अनुज्ञेय होणारा प्रतिनियुक्ती भत्ता आणखी असा मर्यादित केला जाईल की त्याच्या मूळ विभागातील संवर्गात त्याला वेळोवेळी देय झालेले मूळ वेतन व प्रतिनियुक्ती भत्ता यांची एकूण बेरीज प्रतिनियुक्तीवर धारण केलेल्या पदाच्या वेतनमानातील कमाल वेतनाहून किंवा प्रतिनियुक्तीचे पद नियत वेतनावरील असेल तर त्या नियत वेतनाहून अधिक होता कामा नये.

३. ज्या स्वीयेतर सेवेतील शासकीय कर्मचाऱ्याने प्रतिनियुक्तीवरील पदाचे वेतनमान निवडले असेल आणि त्या वेतनमानातील किमान वेतन हे, त्याचे मूळ वेतन अधिक विहित दराने प्रतिनियुक्ती भत्ता यांच्या बेरजेपेक्षा बरेच अधिक असेल त्याचे बाबतीत महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ च्या नियम २० मधील तरतुदी लागू करून त्याचे वेतन निश्चित करण्यात येते. असे करताना यापुढे प्रारंभिक वेतन हे खाली दर्शविलेल्या रकमेपेक्षा अधिक देण्यात येऊ नये :—

| | |
|---|---|
| (अ) रु. २,२०० पेक्षा अधिक मूळ वेतन मिळणाऱ्या कर्मचाऱ्यांकरिता. | मूळ वेतनाच्या १२½ टक्के किंवा रु. ३३० यांपैकी जी अधिक असेल ती रक्कम. |
| (ब) रु. १,००० पेक्षा जास्त पण रु. २,२०० पर्यंत वेतन मिळणाऱ्या कर्मचाऱ्यांकरिता. | मूळ वेतनाच्या १५ टक्के किंवा रु. २०० यांपैकी जी अधिक असेल ती रक्कम. |
| (क) रु. १,००० पर्यंत किंवा त्याहून कमी मूळ वेतन घेणाऱ्या कर्मचाऱ्यांकरिता. | मूळ वेतनाच्या २० टक्के. |

४. ह्या आदेशाच्या प्रयोजनासाठी "वेतन" म्हणजे महाराष्ट्र नागरी सेवा (वेतन) नियम, १९८१ मधील नियम ९ (३६) (एक) मध्ये व्याख्या केल्याप्रमाणे अनुज्ञेय असलेले वेतन असेल. तथापि, महाराष्ट्र नागरी सेवा (सुधारित वेतन) नियम, १९८८ प्रमाणे अनुज्ञेय होणाऱ्या वेतनोत्तर वाढी (Stagnation increments) व तदर्थ वेतनवाढी (ad-hoc increments) ह्या या प्रयोजनासाठी मूळ वेतनाचा भाग समजण्यात येतील.

M H 1152 (12,000—7-90)

५. हे आदेश ते निर्गमित केल्याच्या दिनांकापासून लागू होतील. या दिनांकाच्या नंतर प्रतिनियुक्तीवर जाणाऱ्या कर्मचाऱ्यांच्या बाबतीत त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तींमधील वेतनासंबंधीची अट यापुढे या आदेशाप्रमाणे विहित करण्यात यावी. या आदेशाच्या दिनांकाला जे शासकीय कर्मचारी प्रतिनियुक्तीवर होते त्यांचे बाबतीत त्यांच्या प्रतिनियुक्तीच्या अटी व शर्तींमधील वेतनासंबंधीची विद्यमान अट या आदेशाच्या दिनांकापासून या आदेशानुसार सुधारण्यात यावी. त्यांना या आदेशाच्या दिनांकापूर्वीच्या कालावधीसाठी असुधारीत वेतनश्रेणींच्या आधारावर पूर्वीच्याच दराने प्रतिनियुक्ती भत्ता देय राहील. ज्या कर्मचाऱ्यांचा प्रतिनियुक्तीचा कालावधी/प्रतिनियुक्तीच्या मुदतवाढीचा कालावधी या आदेशाच्या दिनांकापूर्वी संपलेला आहे अशांच्या बाबतीत असुधारित वेतनश्रेणींच्या आधारावर त्यांना यापूर्वी देण्यात आलेल्या मुख्य प्रतिनियुक्ती भत्त्याच्या दरामध्ये कोणताही बदल केला जाणार नाही.

६. महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा आणि निलंबन, बडतर्फी व सेवेतून काढून टाकणे यांच्या काळातील प्रदाने) नियम, १९८१ मधील यासंबंधीच्या सध्याच्या तरतुदी या आदेशांच्या मर्यादेपर्यंत सुधारण्यात आलेल्या आहेत असे मानण्यात यावे. या नियमांना औपचारिक दुरुस्ती यथावकाश करण्यात येईल.

७. या आदेशाची इंग्रजी प्रत सोबत जोडली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

अ. ना. कुलकर्णी,
शासनाचे उप सचिव.

प्रति,

महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र, नागपूर,
महालेखापाल-१ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, मुंबई,
महालेखापाल-२ (लेखा परीक्षा), महाराष्ट्र, नागपूर,
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
राज्यपालांचे सचिव,
मुख्य मंत्र्यांचे सचिव,
सर्व मंत्री आणि राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
मंत्रालयीन सर्व विभाग,
सर्व विभागीय आयुक्त,
मंत्रालयाच्या सर्व विभागांखालील विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (मूळ न्याय शाखा), मुंबई,
*प्रबंधक, उच्च न्यायालय (अपील शाखा), मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई,
*सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, मुंबई,
*प्रबंधक, लोक आयुक्त व उप लोक आयुक्त यांचे कार्यालय, मुंबई,
सिनियर रिसर्च ऑफिसर, पे रिसर्च युनिट, भारत सरकार, वित्त मंत्रालय (व्यय विभाग), खोली क्रमांक २६१, नॉर्थ ब्लॉक, नवी दिल्ली,
संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई,
मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई,
उप मुख्य लेखा परीक्षक, स्थानिक निधी हिशेब, मुंबई/पुणे/नागपूर/औरंगाबाद/नाशिक/अमरावती,
जनसंपर्क अधिकारी, मंत्रालय, मुंबई,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी,
सर्व जिल्हा परिषदांचे मुख्य लेखा व वित्त अधिकारी.

*पत्राद्वारे.

Revision of Deputation Allowance payable to the Government servants on deputation to Foreign Service.

GOVERNMENT OF MAHARASHTRA

Finance Department

Resolution No. FNS 1088/CR-1093/SER-2,

Mantralaya, Bombay 400 032, dated : 8th July 1990.

## RESOLUTION

The standard terms and conditions of transfer of Government servants to foreign service are laid down in Appendix-II to the Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) Rules, 1981. According to the term No. (2) in those standard terms and conditions, while on foreign service the Government servant has the option either to get his pay fixed in the deputation post under the operation of normal rules or to draw pay which he would have drawn in the parent department but for his deputation to foreign service in the scale prescribed for the post which he held immediately prior to his deputation *plus* deputation allowance of not more than 20 per cent of that pay, subject to a maximum of Rs. 250 per month. The question of revision of deputation allowance in respect of Government servants who have opted for drawing deputation allowance while on foreign service, in the light of the Government of India's orders in that behalf and the revision of pay scales of Government servants with effect from 1st January 1986 was under consideration of Government. Government is now pleased to direct that the Government servants who have opted for drawing pay as in Government service and Deputation Allowance thereon, while in foreign service, shall henceforth be paid deputation allowance as hereunder :—

(*a*) 5 per cent of basic pay, subject to maximum of Rs. 250 per month, when the deputation of a Government servant is within the same station,

(*b*) 10 per cent of basic pay, subject to maximum of Rs. 500 per month, in all other cases, i.e. when the deputation is at a station other than the same station :

Provided that the basic pay plus Deputation Allowance shall at no time exceed Rs. 7,300.

*Note.*—For the purpose of (*a*) above "within the same station" shall mean "last place of posting of the employee prior to his being sent on deputation."

2. The Deputation Allowance as admissible under para 1 above shall be further so restricted that the basic pay admissible to the employee in his cadre in the parent department from time to time plus Deputation Allowance does not exceed the maximum of the scale of pay of the post held on deputation; or where the post on deputation is on fixed pay, that fixed pay.

3. In the case of a Government servant on deputation to foreign service who may have elected the scale of pay of the deputation post and the minimum of that scale is substantially in excess of his basic pay *plus* Deputation Allowance at the prescribed rate, his initial pay is fixed after applying the provisions of rule 20 of the Maharashtra Civil Services (Pay) Rules, 1981. Henceforward while doing so, the initial pay shall not exceed the amounts indicated below :—

| | |
|---|---|
| (*a*) For employees in receipt of basic pay above Rs. 2,200. | 12½ per cent of basic pay or Rs. 330, whichever is more. |
| (*b*) For employees in receipt of basic pay above Rs. 1,000 and upto Rs. 2,200. | 15 per cent of basic pay or Rs. 200, whichever is more. |
| (*c*) For employees in receipt of basic pay of and below Rs. 1,000. | 20 per cent of basic pay. |

4. The "Pay" for the purpose of these orders shall be the pay as defined in rule 9(36)(i) of the Maharashtra Civil Services (Pay) Rules, 1981. However, the "stagnation increments" and the "ad-hoc increments" admissible under the Maharashtra Civil Services (Revised Pay) Rules, 1988 shall be considered as a part of the basic pay for this purpose.

5. These orders shall take effect from the date of issue. In the case of Government servants going on deputation to the Foreign Service after the date of these orders, the term regarding pay in the terms and conditions of their deputation to the Foreign Service shall be as prescribed in these orders. In the case of Government servants who are already on deputation on the date of issue of these orders the existing term regarding pay in the terms and conditions of their deputation to the foreign service, shall with effect from the date of issue of these orders be revised in accordance with these orders. The deputation allowance payable to them for the period prior to the date of issue of these orders shall be at the old rate based on their un-revised pay scales. In the case of Government servants whose period of deputation/extended period of deputation to the foreign service has expired before the date of these orders, no change in the old rate of deputation allowance already paid to them on the basis of the un-revised pay scales shall be made.

6. The existing provisions in the Maharashtra Civil Services (Joining Time, Foreign Service and Payments during Suspension, Dismissal and Removal) Rules, 1981 in this respect shall be deemed to have been amended to the extent of the provisions of this Resolution. A formal amendment to these rules will be made in due course.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

A. N. KULKARNI,

Deputy Secretary to Government.